**राज्यातील कारागृहातील सोयीसुविधा स्नानगृहे, शौचालय बांधणे / दुरुस्त करणे या कामांच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : जेएलएम-०११८/प्र.क्र.५/तुरुंग-२**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०५ जून, २०१८

वाचा :-

१) मा.उच्च न्यायालय मुंबई यांनी जनहित याचिका क्र.९/२०१७ मध्ये पारित केलेले आदेश
२) अपर पोलीस महासंचालक व महानिरिक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.बीएलडी/प्र.मान्यता/२०१७-१८/६३१६/कक्ष-६(३), दि.२४.७.२०१७ व दि.९.१.२०१८
३) गृह विभाग शासन निर्णय क्रमांक जेएलएम-०११८/प्र.क्र.५/तुरुंग-२, दि.१७/१/२०१८
४) गृह विभाग शासन निर्णय क्रमांक जेएलएम-१२१६/प्र.क्र.२८९/तुरुंग-२, दि.७/२/२०१८

प्रस्तावना :-

राज्यातील कारागृहातील स्नानगृहे, शौचालय बांधणे/दुरुस्त करणे इ. सोयीसुविधांसंदर्भात उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्र.९/२०१७ मध्ये दि. १.३.२०१७ रोजी आदेश पारित केले आहेत. याबाबत मुख्य सचिव महोदय यांचेकडे दि. ६.१.२०१८ रोजी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये झालेल्या चर्चेस अनुसरुन सचिव बांधकामे यांनी न्यायालयीन निर्णयाच्या अनुषंगाने राज्यातील कारागृहामध्ये अतिरिक्त शौचालय/स्नानगृहे बांधणे या कामांचा आढावा घेतला. त्यास अनुसरुन संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये अपर पोलीस महानिरिक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी रु.३१३.२४ लक्ष इतक्या खर्चाचे अंदाजपत्रके शासनाच्या प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केली आहेत.

सार्वजनिक बांधकाम विभागाने छाननीअंती सदर खर्चात इतर अनुषंगिक बाबींचा समावेश करुन रु.३२४.१५ लक्ष इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकांस सहमती दिली आहे. त्यास अनुसरुन संदर्भाधीन दि.१७ जानेवारी, २०१८ च्या शासन निर्णयान्वये या विभागासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मागणी क्रमांक एच-८, सार्वजनिक बांधकामावरील खर्च, ११ (तुरुंग) (११) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४०५९०९१२) ५३-मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली पुरेशी तरतूद उपलब्ध नसल्याने मागणी क्रमांक बी-१०, ४०७० इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, ८००-इतर खर्च (००) (११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे (४०७००२११), ५३- मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या मंजुर तरतूदीमधून खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तसेच संदर्भाधीन दि.७ फेब्रुवारी, २०१८ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील नवीन कारागृह व सध्या असलेल्या सर्व कारागृहाशी निगडीत इमारतीचे बांधकाम/दुरुस्तीची कामे पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळामार्फत करण्यास मान्यता देण्यात आली होती. तथापि, सदर कामे मार्च २०१८ पूर्वी सुरु न झाल्याने व वर्ष २०१८-१९ च्या अर्थसंकल्पात नियमित मागणी क्रमांक एच-८, (४०५९०९१२) या लेखाशिर्षाखाली पुरेशी तरतूद उपलब्ध झाल्याने सदरचे संदर्भाधीन दि.१७ जानेवारी २०१८ व दि.७ फेब्रुवारी २०१८ चे शासन निर्णय

रद्द करुन, मध्यवर्ती कारागृह येरवडा, ठाणे व जिल्हा कारागृह कल्याण येथील प्रसाधनगृहे व स्नानगृहे येथील बांधकामाकरिता येणाऱ्या रु.३२४.१५ लक्ष इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास नव्याने प्रशासकीय मंजुरी देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील कारागृहातील खालील नमूद कामांसाठी येणाऱ्या एकूण रु.३२४.१५ लक्ष (रुपये तीन कोटी चोवीस लक्ष पंधरा हजार फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन शासन निर्णय दि.१७/१/२०१८ अन्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता व शासन निर्णय दि.१५/२/२०१८ द्वारे काढण्यात आलेले शुध्दीपत्रक रद्द करुन या शासन निर्णयान्वये नव्याने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कारागृहाचे नांव/कामाचे नांव | अंदाजित खर्च (रु.लाखात) |
|---|---|---|
| १ | येरवडा मध्यवर्ती कारागृहामध्ये ४० स्नानओटे बांधणे | १२४.०५ |
| २ | येरवडा मध्यवर्ती कारागृहामध्ये ३० महिला स्नानओटे बांधणे | २६.६४ |
| ३ | ठाणे मध्यवर्ती कारागृहामध्ये १२० शौचालय बांधणे | १५०.८१ |
| ४ | कल्याण जिल्हा कारागृहामध्ये २१ प्रसाधनगृहे व २ स्नानगृहे बांधणे | २२.६५ |
| | **एकूण -** | **३२४.१५** |

२. सदरची अंदाजपत्रक सन २०१६-१७ च्या दरसूचीवर आधारित असून, सदर अंदाजपत्रकामध्ये आकस्मिक खर्चासाठी ४ टक्के, वस्तु व सेवा कर १२%, सेंटेज चार्जेस ५% इ.साठी तरतूदी समाविष्ट करण्यात आल्या आहेत.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.एच-८, ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, (११) (तुरुंग) (११) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४०५९०९१२) ५३-मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक-३, नियम १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेले अधिकार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०५११५८२७८५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावानं,

Siddharth Vidyadhar Dhandore

Digitally signed by Siddharth Vidyadhar Dhandore
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=18c12c8352414c8a8937fd0998c9ca8d81b7ea489acfd971bb6de950e8d1d54f, serialNumber=5d16166df09e111cba9c7d5e4e321b340111df7b21c5b0fff0be638e80ea9a1b, cn=Siddharth Vidyadhar Dhandore
Date: 2018.06.05 11:57:30 +05'30'

**( सि. वि. धांडोरे )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. पोलीस महासंचालक (कारागृह), महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. अपर पोलीस महासंचालक व महानिरिक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. विशेष पोलीस महानिरिक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे
६. विशेष पोलीस महानिरिक्षक, दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई
७. कारागृह उपमहानिरिक्षक, पश्चिम विभाग, पुणे
८. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ठाणे
११. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे/ठाणे
१२. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२
१३. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. निवडनस्ती (तुरुंग-२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२